जिल्हा रूग्णालय, बीड येथील सिमेंट कॉक्रीट नालीचे बांधकाम व धोबीघाटाच्या दुरुस्तीचे अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः प्रशामा-२०१५/ प्र.क्र.१५८/ आरोग्य-४**
मंत्रालय, १० वा मजला, कॉम्पलेक्स बिल्डींग,
गोकूळदास तेजपाल रूग्णालय आवार, मुंबई.
तारीख: ३० ऑक्टोबर, २०१५.

वाचा

**सहसंचालक, आरोग्य सेवा, रूग्णालये (राज्यस्तर) ,मुंबई यांचे पत्र क्रमांकः संआसे/कक्ष-३/टे-६/बांध.बीडदुरु/३-११२८-२९/१५, दि.१५.०७.२०१५.**

शासन निर्णय

जिल्हा रूग्णालय, बीड येथील परिसरातील सिमेंट कॉक्रीट नालीचे बांधकाम व धोबी घाटाच्या दुरुस्तीची एकूण रूपये १,४७,५७,४९२/- इतक्या किंमतीची १५ अंदाजपत्रके शासनास प्राप्त झाली आहेत. सदर अंदाजपत्रके कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, बीड यांनी प्रमाणित केलेली आहेत व जिल्हा शल्य चिकित्सक, बीड यांनी साक्षांकित केलेली आहेत. तसेच सदर अंदाजपत्रके सन २०१३-१४ च्या दरसूचीवर आधारीत आहेत. सदर अंदाजपत्रकांतील प्रस्तावित कामांना सार्वजनिक बांधकाम विभागाने खालीलप्रमाणे सहमती दर्शविली आहे.

| अ. क्र. | कामाचे स्वरूप | कामावरील खर्च रू. |
|---|---|---|
| १. | सिमेंट कॉक्रेट नालीचे बांधकाम करणे (उजवी बाजू) भाग-१ | ९,७१,६२३/- |
| २. | सिमेंट कॉक्रेट नालीचे बांधकाम करणे (उजवी बाजू) भाग-२ | ९,७१,६२३/- |
| ३. | सिमेंट कॉक्रेट नालीचे बांधकाम करणे (उजवी बाजू) भाग-३ | ९,७१,६२३/- |
| ४. | सिमेंट कॉक्रेट नालीचे बांधकाम करणे (उजवी बाजू) भाग-४ | ९,७१,६२३/- |
| ५. | सिमेंट कॉक्रेट नालीचे बांधकाम करणे (डावी बाजू) भाग-१ | ९,७१,६२३/- |
| ६. | सिमेंट कॉक्रेट नालीचे बांधकाम करणे (डावी बाजू) भाग-२ | ९,७१,६२३/- |
| ७. | सिमेंट कॉक्रेट नालीचे बांधकाम करणे (डावी बाजू) भाग-३ | ९,७१,६२३/- |
| ८. | सिमेंट कॉक्रेट नालीचे बांधकाम करणे (डावी बाजू) भाग-४ | ९,७१,६२३/- |
| ९. | नालीचे जलमलनिस्सारणासाठी (पाणी बाहेर जाण्यासाठी) आर.सी.सी. पाईप बसविणे भाग-१ | ९,७८,८५८/- |
| १०. | नालीचे जलमलनिस्सारणासाठी (पाणी बाहेर जाण्यासाठी) आर. सी.सी. पाईप बसविणे भाग-२ | ९,७८,८५८/- |

| अ. क्र. | कामाचे स्वरूप | कामावरील खर्च रू. |
|---|---|---|
| ११. | नालीचे जलमलनिस्सारणासाठी (पाणी बाहेर जाण्यासाठी) आर. सी.सी. पाईप बसविणे भाग-३ | ९,७८,८५८/- |
| १२. | नालीचे जलमलनिस्सारणासाठी (पाणी बाहेर जाण्यासाठी) आर. सी.सी. पाईप बसविणे भाग-४ | ९,७८,८५८/- |
| १३. | नालीचे जलमलनिस्सारणासाठी (पाणी बाहेर जाण्यासाठी) आर. सी.सी. पाईप बसविणे भाग-५ | ९,७८,८५८/- |
| १४. | धोबी घाटाच्या दुरुस्तीचे काम करणे भाग-१ | ८,०२,०६८/- |
| १५. | धोबी घाटाच्या दुरुस्तीचे काम करणे भाग-२ | ९,२२,४०२/- |
| | **एकूण** | **१,४३,९१,७४४/-** |

जिल्हा रूग्णालय, बीड येथील परिसरात सिमेंट कॉक्रीट नालीचे बांधकाम व धोबी घाटाच्या दुरुस्तीचे अंदाजपत्रकास मुख्य इमारत व कमर्चारी निवासस्थान दुरूस्तीच्या एकूण १५ अंदाजपत्रकांच्या एकूण रूपये १,४३,९१,७४४/- (अक्षरी रुपये एक कोटी एक्क्यान्नव लक्ष सातशे चौरेचाळीस फक्त) इतक्या रक्कमेस या शासन निर्णयान्वये पुढीलप्रमाणे अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

**अटी व शर्ती:-**

१. ढोबळ स्वरूपात धरण्यात आलेल्या तरतूदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक दरपत्रके मंजुर करूनच काम हाती घ्यावे.
२. या कामासाठी निविदा मागविण्याआधी सदर कामाकरीता सार्वजनिक बांधकाम विभागातील सक्षम अधिकाऱ्यांची तांत्रिक मंजुरी घेणे आवश्यक राहील. सदर कामांची एकत्रित निविदा काढण्यात यावी.
३. अर्थसंकल्पात निधीची तरतूद करण्याचा प्रस्ताव संचालक, आरोग्य सेवा, मुंबई यांनी शासनास सादर करावा. तसेच अर्थसंकल्पात निधीची तरतूद केल्याशिवाय सदर कामास सुरूवात करण्यात येऊ नये.

सदर दुरूस्तीकरीता आवश्यक निधी खालील लेखाशीर्षाखाली भागविण्यात यावा.

**मागणी क्र. एच-८**

४२१०- वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य
०१- नागरी आरोग्य सेवा ( वैद्यकीय सहाय्य )
११०- रूग्णालये व दवाखाने
(१) (अ )- पंचवार्षीक योजनांतर्गत योजना-इमारती
(००) (०१)- मोठी बांधकामे ( ४२१० ००१४ )
५३- मोठी बांधकामे

सदर शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.४२६/१५/इमा-३, दि.१०.०९.२०१५ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार व वित्त विभागाच्या शा.नि. क्र.विअप्र-२०१३/ प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दि.१७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्ट भाग-पहिला, उपविभाग-पाच मधील अनुक्रमांक १० येथील परिच्छेद क्र.१३४ अनुसार प्रशासनिक विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५१०३०१४५३५८८४१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ashok T Uike

Digitally signed by Ashok T Uike
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400001, st=Maharashtra, cn=Ashok T Uike
Date: 2015.10.30 16:27:02 +05'30'

**अ.ता.उईके**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.
२. सहसंचालक, आरोग्य सेवा, रूग्णालये (राज्यस्तर), मुंबई.
३. सहाय्यक संचालक ( लेखा व लेखापरिक्षा ), आरोग्य सेवा, पुणे.
४. सहसंचालक, आरोग्य सेवा ( अर्थ व प्रशासन ), पुणे.
५. उपसंचालक, आरोग्य सेवा, लातूर मंडळ, लातूर.
६. जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा रूग्णालय, बीड.
७. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, बीड.
८. जिल्हा कोषागार अधिकारी, बीड.
९. सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-३), मंत्रालय, मुंबई
१०.वित्त विभाग (विनियम कार्यासन ), मंत्रालय, मुंबई.
११.कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), सा.आ.वि., मंत्रालय, मुंबई
१२.निवडनस्ती( आरोग्य-४ ), सा.आ.वि.